**१४ वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेंतर्गत नाशिक जिल्ह्यातील नाशिक, दिंडोरी व येवला येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती / नविनीकरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण १११६/८९५/प्र.क्र.१६५/कार्या.११**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक २१ ऑगस्ट, २०१७

वाचा : १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/कार्या.९, दि.१०/११/२०१६

२. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/नऊ, दि.१२/६/२०१७.

३. प्रबंधक (निरिक्षणे २) यांचे पत्र क्र. क्र.B(W)६०४९/२०१०/२७८०, दि.१४/१०/२०१६

४. जिल्हा न्यायालय, नाशिक यांचे पत्र क्र. Bldg/५३५७/२०१६, दि.२६/८/२०१६

**प्रस्तावना :**

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या “न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण” (Strengthening the Justice Sector) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण या घटकासाठी ५ वर्षाच्या कालावधीकरीता रु.२२८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दि.९/३/२०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भाधीन दि.१२/६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीच्या कामांना रुपये ५० लक्ष मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक व त्यांच्या अधिपत्याखालील दिंडोरी व येवला येथील न्यायालयाच्या दुरुस्ती /नविनीकरणाचे सन २०१५-२०१६ च्या दरसूचीवरील प्रस्ताव उपरोक्त संदर्भ क्र.३ येथे नमूद पत्रान्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून शासनास प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रके संबंधित उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांनी तयार केली असून संबंधित कार्यकारी अभियंता यांनी साक्षांकित केली आहेत. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे नमूद केलेल्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यंता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेअंतर्गत जिल्हा न्यायालय, नाशिक व त्यांच्या अधिपत्याखालील दिंडोरी व येवला येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती /नुतनिकरणासाठी अनुक्रमे रु.१६,१७,९१२/-, रु.२७,५४,२००/- व रु.६,०७,६०७/- अशा एकणू ४९,७९,७१९/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख एकोणऐंशी हजार सातशे एकोणीस फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नाशिक व यांच्या अधिपत्याखालील दिडोंरी व येवला येथील न्यायालयीन इमारती १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाच्या दुरुस्ती / नुतनीकरण या योजनेअंतर्गत करावयाचा कामाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

**जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक**

| अ.क्र. | न्यायालयीन इमारत | १४ व्या वित्त आयोगांतर्गत प्रस्तावित कामे | सा.बां.विभागाने अंदाजपत्रकाची परिगणित करुन मान्यता दिलेली किंमत (रुपयात) |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | Establishing valuable witness deposition center & providing wooden ramp | १६,१७,९१२/- |
| २ | दिंडोरी | Establishing vurneble witness deposition centre<br>Making witness adaptable to wheel chairs<br>To make arrangement that the accused and vulnerable witness shall not come face to face<br>Construction of a closed cubical for accused having one way glass<br>Ramp facility<br>Adaption of toilet for wheel chair users<br>Brail symbol and auditory signals in toilets<br>Sanitation facility and plinth protection<br>Barrier free court rooms for person with disability<br>Internal & External coloring<br>Repairs door and window | २७,५४,२००/- |
| ३ | येवला | Providing amenities to Court building | ६,०७,६०७/- |
| | | **एकूण (रुपये)** | **४९,७९,७१९/-** |

जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक व त्यांच्या अधिपत्याखालील दिंडोरी व येवला येथील न्यायालयीन इमारतीच्या नविनीकरणासाठी येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण,(११)(०१)कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८) या लेखाशीर्षाखाली सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी उपरोक्त कामे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या Dedicated Cell ने निश्चित केलेल्या १३ कामामधील असल्याची खातरजमा करण्याची तसेच सदर

अंदाजपत्रके सक्षम अधिका-याकडून साक्षांकित करण्याची जबाबदारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नाशिक यांची राहील. तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.५१८/१७/इमा-२, दि.६/६/२०१७, व त्या विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.१२/६/२०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२१११५९५२३८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Anita Dipak Ripote

Digitally signed by Anita Dipak Ripote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28bdb8b03e204307a26238ccccb76a2c1eaa9ed4838f450b88dfb9ca9793b4b5, serialNumber=25e18795e96deb90b1428c41cb6c87bc90c3bb1f0ea059da3e0a07a3bc00c6c8, cn=Anita Dipak Ripote
Date: 2017.08.21 11:49:39 +05'30'

(अनिता रिपोटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा सत्र न्यायाधीश, नाशिक,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई,
४. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
६. उप जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९. विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई,
१०.निवडनस्ती.